रु.३ लाखापेक्षा अधिक खर्चाच्या कामांना
ई-निविदा कार्यप्रणाली लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्रमांक : मातंसं/नस्ती-२०१२/प्र.क्र.२७३ /३९
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :२६ नोव्हेंबर, २०१४

<u>वाचा</u> :- १. शासन निर्णय क्रमांक : मातंसं/नस्ती-२०१०/प्र.क्र.३४/३९, दि. ६ ऑगस्ट, २०१०
२. शासन निर्णय क्रमांक: मातंसं/नस्ती-२०१२/प्र.क्र.२७३ /३९ दि.१६ जानेवारी, २०१३

**<u>प्रस्तावना : -</u>**

शासकीय कामे, साधन सामुग्रीची खरेदी इत्यादीमध्ये पारदर्शीपणा आणण्यासाठी शासकीय खरेदी कामे इत्यादी करिता ई-निविदा पध्दतीचा अवलंब करण्याचा निर्णय दि. ६ ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. या निर्णयानुसार रु.५० लक्ष पेक्षा जास्त किमतीच्या निविदांसाठी ई-निविदा प्रणालीचा वापर करणे अनिवार्य होते. पुढे दिनांक १६ जानेवारी, २०१३ च्या शासन निर्णयान्वये रु. १० लक्ष करण्यात आली. शासनाच्या खरेदीमध्ये जास्तीत जास्त पारदर्शीपणासाठी ई-निविदा प्रणालीकरिता निविदेबाबत किमतीची मर्यादा कमी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर आज दिनांक २६/११/२०१४ पासून रु.३ लक्ष पेक्षा जास्त किमतीच्या निविदेकरिता ई-निविदा पद्धतीचा अवलंब करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सर्व मंत्रालयीन विभागांनी आणि त्यांच्या अधिनस्त कार्यालये,महामंडळे, मंडळे यांनी रु.३ लक्ष पेक्षा जास्त किंमतीच्या निविदा प्रक्रियेकरिता ई-निविदा प्रक्रियेचा अवलंब करावा.

ई-निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी पुढील आदेश निर्गमित होईपर्यंत NIC (NATIONAL INFORMATIC CENTRE) किंवा सिफी नेक्स टेंडर्स ई-निविदा कार्यप्रणालीचा वापर करावा. शक्य होईल तोवर जास्तीत जास्त ई-निविदा एनआयसीच्या कार्यप्रणालीद्वारे प्रसिद्ध करण्यात याव्यात.

ई-टेंडरिंग प्रणालीविषयी माहिती, अधिकारी/कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण, सादरीकरण इत्यादी बाबतीत संपर्क साधण्यासाठी खालील विवरणपत्रात माहिती देण्यात येत आहे.

| NIC | Sify Nex Tenders |
|---|---|
| दूरध्वनी क्रमांक : १८००३०७०२२३२ (Toll Free)<br>ई-मेल : eproc.support@maharashtra.gov.in<br>संकेतस्थळ : https://mahatenders.gov.in | दूरध्वनी क्रमांक :०२०-३०१८७५००<br>ई-मेल : support.gom@nextenders.com<br>संकेतस्थळ : https://maharashtra.etenders.in |

| DIT (माहिती तंत्रज्ञान संचालनालय) |
|---|
| Nodal Officer E-Procurement/ Project Consultant E-Procurement :<br>ई-मेल : eproc.support@maharashtra.gov.in<br>दूरध्वनी क्रमांक : ०२२-२२८१७९९० फॅक्स ०२२-२२०२४१७७ |

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४११२५११५३२७८८११ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Signature Not Verified
Digitally signed by RAJESH MADANLAL AGGARWAL
Date: 2014.11.26 16:32:12 IST
Reason:

(राजेश अग्रवाल)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
५. सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
६. प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
७. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
८. सचिव, राज्य निवडणूक आयोग (पत्राने),
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
१०.सचिव, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई (पत्राने),
११.सचिव, महाराष्ट्र विधान परिषद, मुंबई (पत्राने),
१२.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१३.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई
१४.महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर
१६.अधिदान व लेख अधिकारी, मुंबई,
१७.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१८. मुख लेखा परीक्षक (निवासी लेखे), कोकण भवन, नवी मुंबई,
१९.सर्व विभागीय आयुक्त,
२०.सर्व जिल्हाधिकारी,
२१.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२२.सा.प्र.वि. कार्यासन-३९
२३.सर्व मंत्रालयीन विभाग,
२४.निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख